पदोन्नतीने देण्यात आलेल्या पदस्थापनेतील बदल
उप अभियंता (स्थापत्य)
सार्वजनिक बांधकाम विभाग.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

## शासन आदेश क्रमांकः पीओजी-२०२१/ प्र.क्र.२१६/सेवा-२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०७.०१.२०२२

संदर्भ- सा.बां.वि.,शासन आदेश, क्र.पीओजी-२०२१/प्र.क्र.१७७/सेवा-२, दि.३.१२.२०२१

## शासन आदेश

संदर्भाधीन शासन आदेशान्वये श्री.महेश फुलचंद परदेशी, कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांना कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) संवर्गातून महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा, गट-अ मध्ये उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावर पदोन्नती देण्यात आली आहे. श्री.परदेशी हे दिव्यांग अधिकारी असल्याने त्यांनी पदोन्नती उपरांत पदस्थापनेसाठी नागपूर महसूल विभागाचा पसंतीक्रम दिला होता. तथापि, श्री.परदेशी यांना त्याच पदोन्नती आदेशातील अन्य अधिकारी यांचे नामसाधर्म्यामुळे अनावधानाने पुणे महसूल विभागांतर्गत उप कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, अकलूज, जि.सोलापूर या पदावर पदस्थापना देण्यात आली.

श्री. परदेशी यांना शासन अधिसूचना, दि.१४.७.२०२१ मधील नियम ७ (१)(क) नुसार त्यांना महसूल विभाग वाटपातून सूट अनुज्ञेय आहे. त्यामुळे त्यांची पदस्थापना नागपूर महसूल विभागामध्ये खालील तक्त्यात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उप अभियंता (स्थापत्य) यांचे नांव | दि.३.१२.२०२१ च्या पदोन्नती आदेशान्वये पदस्थापना देण्यात आलेले ठिकाण | दिनांक ३.१२.२०२१ च्या पदोन्नती आदेशामध्ये बदल करून सुधारित पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | श्री.महेश फुलचंद परदेशी | उप कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, अकलूज जि.सोलापूर | जि.प.(बांध) उप विभाग, भंडारा |

२. उपरोक्त उप अभियंता यांच्या बाबतीत संदर्भाधीन पदोन्नती आदेशातील अटी व शर्ती कायम राहतील.

३. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी उक्त नमूद उप अभियंता यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

४. उपरोक्त उप अभियंता यांनी नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब शासनास सादर करावा. उपरोक्त अभियंत्यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील

नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, बदली झालेल्या अभियंत्यांनी बदलीच्या ठिकाणी रूजू होण्याची दक्षता घ्यावी, अन्यथा या पदग्रहण अवधीत बदलीच्या पदावर रूजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९, मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षता घेता, त्यांनी पदस्थापनेत बदली करण्यासाठी कुठल्याही स्वरूपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

५. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी उक्त उप अभियंता यांनी पदभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहीत कालावधीत संबंधित अधिकारी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणेकरुन संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज स्वीकारु नयेत/ मंजूर करु नयेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१०७१७२००३६३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Patil Swati Sachin

Digitally signed by Patil Swati Sachin
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=a08a4a756cd7e1e1ea2a6f91922d10f103cebd44790093322544672eefd3784b, serialNumber=41a9218232bbaea65861213d86d108ea7c48905da5f33dba9c8f6662cb8f9e18, cn=Patil Swati Sachin
Date: 2022.01.07 17:20:12 +05'30'

**( स्वा.स.पाटील )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल १/२ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई/नागपूर
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग पुणे/नागपूर
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, भंडारा
४. जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा
५. श्री.महेश फुलचंद परदेशी, उप अभियंता यांना संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांच्यामार्फत
६. मा.मंत्री(सा.बां.)(सार्वजनिक उपक्रम वगळून) /मा.मंत्री, सा.बां.(सार्वजनिक उपक्रम) / मा.राज्यमंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून)/मा.राज्यमंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव सचिव (सा.बां.)यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
८. सचिव (रस्ते)/ सचिव(बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
९. निवडनस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेवा-२.